परिभाषित अशंदान निवृत्तीवेतन/ राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेअंतर्गत सानुग्रह अनुदान मंजूर करण्याबाबत...
दिवंगत गजेंद्र परसराम ऊईके, कनिष्ठ लिपिक.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन आदेश क्रमांक: मुविनि-२०२१/प्र.क्र.१६५/ऊर्जा -५**
हुतात्मा राजगुरू चौक, मादामा कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दि . ०७ जानेवारी, २०२२

वाचा:-

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. अंनियो-२०१७/प्र.क्र.२९/सेवा-४, दि. २९.०९.२०१८.
२) मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांचा क्र. मुविनि/का-२/आस्था-१/१४०१/२०२१, दि. ०८.०७.२०२१ व दि. ०७.१२.२०२१ अन्वये प्राप्त प्रस्ताव.
३) दिवंगत गजेंद्र परसराम ऊईके यांचे नामनिर्देशित व्यक्ती/ कायदेशीर वारसदार श्रीमती चंद्रकला गजेंद्र ऊईके यांचा सानुग्रह अनुदान मिळण्याकरिता प्राप्त झालेला दि. २२.०४.२०२१ रोजीचा अर्ज.

**शासन आदेश:-**

उपरोक्त संदर्भ क्रमांक (२) अन्वये मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांच्याकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावासोबत श्रीमती चंद्रकला गजेंद्र ऊईके यांचा संदर्भ क्र. (३) येथे नमूद केलेल्या अर्जाच्या अनुषंगाने प्रशासकीय विभाग प्रमुख हे त्यांना संदर्भ क्र. १ येथील वित्त विभाग शासन निर्णय क्र. अंनियो-२०१७/ प्र.क्र.२९/ सेवा-४, दि. २९.०९.२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारानुसार दिवंगत गजेंद्र परसराम ऊईके, कनिष्ठ लिपिक यांनी नामनिर्देशित केलेल्या त्यांच्या पत्नी श्रीमती चंद्रकला गजेंद्र ऊईके यांना १०० टक्के सानुग्रह अनुदान रूपये १०,००,०००/- (अक्षरी रूपये दहा लाख फक्त) मंजूर करीत आहेत.

२. सदर "सानुग्रह अनुदान" शासकीय कर्मचारी सेवेत असताना १० वर्ष शासन सेवा होण्यापूर्वी दि. २८.०३.२०२१ रोजी मृत्यू पावल्यामुळे मंजूर करण्यात येत आहे. सदर आदेश, आदेशाच्या दिनांकापासून १ वर्षे कालावधीसाठी ग्राह्य राहतील.

३. सदरचा खर्च "मागणी क्र. जी-६ २०७१-निवृत्तीवेतन व इतर सेवानिवृत्ती लाभ ०१ नागरी १०३ अनुकंपा भत्ते (००) (०६)- परिभाषित अंशदान/ राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेंतर्गत सानुग्रह अनुदान (२०७१०७२२)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येईल.

४. सदर शासन आदेश संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयातील अनुक्रमांक ५ येथे नमूद केल्यानुसार प्रशासकीय विभाग प्रमुख यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१०७१२२८१०३६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAM CHAUDHARI

Digitally signed by RAM CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSRTY, ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e44d5d15adae961af6d1ac849c24fa6be219c4e5a8accfa2ef8db48a9c886c40, pseudonym=8EDCBBC09460CD9488F7A18CC48C8B95B3908056, serialNumber=08959C5CFE10323630591C090854AAD890486067A7D6331EC64E373717E8D56D, cn=RAM CHAUDHARI
Date: 2022.01.07 12:29:03 +05'30'

**( राम चौधरी )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
२. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
३. मुख्य विद्युत निरीक्षक, यांचे कार्यालय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, ३ रा मजला, प्रशासकीय इमारत, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर (पुर्व) मुंबई-७१.
४. अधिक्षक अभियंता, नागपूर प्रादेशिक विद्युत निरीक्षण मंडळ, नागपूर.
५. श्रीमती चंद्रकला गजेंद्र ऊईके, पोलीस संकूल समोर, गोंडवाना नगर प्रभाग क्र. १६, देवरी, जि. गोंदिया-४४१९०१ यांना (मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई) यांच्यामार्फत माहितीस्तव.
६. निवडनस्ती (ऊर्जा-५).